नाशिक विभागातील जिल्हा तांत्रिक सेवा व जिल्हा सेवा वर्ग-३ मधील कर्मचाऱ्यांच्या महाराष्ट्र विकास सेवा गट-ब मध्ये निवडीने नियुक्त्या

**महाराष्ट्र शासन**

ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
आदेश क्र.: मविसे १०/२०१०/प्र.क्र.२०/आस्था-३-अ,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२, दिनांक : १७ नोव्हेंबर,२०११.

**संदर्भ** : शासन आदेश, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.मविसे १०/२००८/ प्र.क्र.१५०/आस्था-३, दिनांक १५.७.२००९

**आदेश :-**

श्री. वाय. आर. निकुंभे यांनी जात वैधता प्रमाणपत्र सादर केलेले नसल्यामुळे शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.बीसीसी-१२०७/प्र.क्र.५३/०८/१६-ब, दिनांक १६.६२००८ मधील तरतुदींनुसार संदर्भाधीन शासन निर्णयान्वये नाशिक विभागाअंतर्गत जिल्हा तांत्रिक सेवा व जिल्हा सेवा वर्ग-३ मधील श्री. टी. टी. सोनावणे, विस्तार अधिकारी (सांख्यिकी), जिल्हा परिषद, नाशिक यांना तात्पुरत्या स्वरुपात महाराष्ट्र विकास सेवा, गट-ब मध्ये रुपये ६५००-२००-१०५०० या वेतनश्रेणीत निवडीने नियुक्ती देण्यात आली आहे. श्री. वाय. आर. निकुंभे दिनांक ३१.५.२०११ रोजी नियत वयोमानानुसार शासकीय सेवेतून सेवानिवृत्त झाल्यामुळे सदर प्रवर्गातील पद पदोन्नतीसाठी उपलब्ध झाले आहे.

आता या शासन आदेशान्वये नाशिक विभागातील जिल्हा तांत्रिक सेवा व जिल्हा सेवा वर्ग-३ मधील श्री. टी. टी. सोनावणे यांना महाराष्ट्र विकास सेवा गट-ब या संवर्गात पीबी-२ वेतनश्रेणी रुपये ९३००-३४८००+४४०० ग्रेडवेतन या वेतनश्रेणीत तात्पुरत्या स्वरुपात निवडीने नियुक्ती देण्यात येत आहे. तसेच, श्री. सोनावणे, गट विकास अधिकारी (प्रशासन), विभागीय आयुक्त कार्यालय, नाशिक विभाग, नाशिक या पदावर कार्यरत राहतील.

२. श्री. सोनावणे यांना देण्यात आलेली निवडीने नियुक्ती ही खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

अ) पदोन्नतीच्या कोटयातील पदावर देण्यात येत असलेली पदोन्नती तात्पुरत्या स्वरूपाची असून, ती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

ब ) सदर पदोन्नती ही श्री. टी. टी. सोनावणे यांनी या आदेशाच्या दिनांकापासून महाराष्ट्र विकास सेवा विभागीय परिक्षा नियम १९९१ व सुधारणा नियम १९९८ मधील तरतूदी नुसार विहीत मुदतीत परिक्षा उत्तीर्ण होण्याच्या अधीन राहून देण्यात येत आहे. अन्यथा ते पदावनतीस पात्र ठरतील.

क ) सदर पदोन्नती शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक : एसआरव्ही १०८७ /२००/ प्र.क्र.३ / ८७ / १२, दिनांक ८.१०.१९९० मधील तरतुदीच्या अधीन राहील.

ड) सदर पदोन्नती ही जे अधिकारी ज्येष्ठ आहेत, परंतु ज्यांची प्रकरणे विचारार्थ खुली ठेवण्यात आलेली आहेत, अशा अधिका-यांच्या ज्येष्ठतेस बाधा न आणता देण्यात येत आहे.

इ) सदर पदोन्नती ही मुंबई उच्च न्यायालयातील याचिका क्रमांक ८४५२ / २००४ मध्ये होणा-या निर्णयाच्या अंतिम निकालाच्या अधीन राहील.

ई) सदर पदोन्नती ही त्यांच्या वयाच्या ५०/५५ व्या वर्षानंतर पुनर्विलोकन करावयाच्या शासन निर्णयाच्या अधीन राहील.

३. सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक २०१११११८०९१२१६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( रविंद्र पाटील )
कार्यासन अधिकारी,
ग्राम विकास व जलसंधारण विभाग

प्रति

१. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने )
२. सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
३. विभागीय आयुक्त, नाशिक विभाग, नाशिक
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक, धुळे, जळगांव, अहमदनगर, नंदूरबार
५. मुख्य लेखा व वित्त अधिकारी जिल्हा परिषद, नाशिक, धुळे, जळगांव, अहमदनगर, नंदूरबार
६. संचालक, एकात्मिक बाल विकास सेवा योजन संचालनालय, नवी मुंबई.
७. महालेखापाल १/२ (लेखा परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
८. खाजगी सचिव, मा. मंत्री, (ग्राम विकास )
९. खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री, (ग्राम विकास )
१०. सचिव (ग्राम विकास व पंचायत राज ) यांचे स्वीय सहायक
११ संबंधित अधिकारी (द्वारा मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद)
१२. कार्यासन क्रमांक आस्था-२ / योजना -५ ग्राम विकास व जलसंधारण विभाग
१३. निवड नस्ती, का.क्र. आस्था-३अ ग्राम विकास व जलसंधारण विभाग